# गुलाम ते सैनिक

## नागरी युद्धातील सत्य घटनेवर आधारित

लेखिका: डेबोरा हॉपकिन्सन
चित्रे: ब्रायन फ्लोका
मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



”मी तुझ्यासारखा तरूण असतो तर सैन्यात भर्ती झालो असतो!”

जॉनीला सिलासकाका आणि मालकाचे खेचर नेल यांच्याबद्दल जिव्हाळा आहे. पण त्याला आपण गुलाम आहोत, याचा तिरस्कार वाटतो. मालकाच्या शेताजवळून कधीकधी सैनिकांची कवायत जाते. त्यांतील कुणी एकदा जॉनीला सैन्यात भर्ती होशील का, म्हणून विचारतो. जॉनी एका पायावर तयार होतो, भले मग सिलासकाका आणि नेल यांच्यापासून दूर जावे लागले तरी चालेल!

सैनिक बनणे सोपे काम नाही. जॉनीला डेव्ह नावाच्या सैनिकासोबत तसेच एका खेचरांच्या कळपासोबत काम करण्याची संधी मिळते. पण सैन्यात दाखल होण्याचा आपला निर्णय योग्य होता का, याबद्दल त्याला अद्याप शंका वाटते.

एके दिवशी सैन्याची एक तुकडी गस्त घालण्यासाठी नदीपल्याड जाते. त्यांना जेवण घेऊन जाण्यासाठी कुणीही नसते. जॉनी खेचरांच्या मदतीने हे काम करू शकेल? तो सगळ्या खेचरांना हाताळू शकेल?

ही कथा जॉन मॅक्लाईनच्या आयुष्यावर आधारित आहे. तरूणपणी जॉन मॅक्लाईनने सैन्यात भर्ती होऊन गुलामगिरीतून मुक्ति मिळवली होती.

मुक्त राज्य

गुलाम राज्य

राजधान्या

## जॉनी आणि नेल

*जॉनी* एक लहान मुलगा होता. पण दररोज सकाळी तो *नेल* या आपल्या मालकाच्या खेचराच्या पाठीवर बसून चाळीस गायींना दूध काढण्यासाठी गोठ्यात नेत असे.

यानंतर जॉनी लोणी घुसळण्यास मदत करत असे, झऱ्यातून पाण्याच्या बादल्या भरून आणत असे आणि नेलवर स्वार होऊन शेतातील मजुरांसाठी जेवण घेऊन जात असे. जॉनी दिवसभर राबत असे, पण कुणीही कधी त्याचे साधे आभारदेखील मानत नसे.

उलट, एकदा एक गाय वाट चुकून भरकटली तेव्हा मालकिणीने जॉनीला बेदम मारले.





सिलासकाकाही स्वतंत्र होण्यास आतुर होते. “दक्षिणेतल्या लोकांना आपल्याला गुलामच ठेवायचं आहे. पण अब्राहम लिंकनला गुलामगिरी संपवायची आहे,” सिलासकाका जॉनीला म्हणाले.

“युद्ध सुरू झाल्यावर तुम्ही लढायला जाणार?” जॉनीने त्यांना विचारले.

सिलासकाका हळुवारपणे म्हणाले, “मी खूप म्हातारा झालोय, त्यामुळे सैनिक बनू शकत नाही. पण मी तुझ्यासारखा तरूण असतो, तर नक्कीच सैन्यात भर्ती झालो असतो.”

मग नेलच्या मानेवर डोके ठेवून रडत रडत जॉनी कुजबुजला, “बघ नेल, मी जीव तोडून कष्ट करतो, पण कुणाला त्याची पर्वा नाही. आईनंतर मला तू आणि *सिलासकाका*शिवाय कुणीही नाही. माझा खूप जीव आहे तुझ्यावर, नेल. पण मला ही गुलामी नको वाटते.”





## सैनिक

थंडीच्या दिवसांत एकदा जॉनी आणि नेल गायींना रस्त्यानजिकच्या एका कुरणात चरण्यासाठी नेत होते. अचानक, नेल मोठ्याने फुरफुरू लागला.

जॉनीने शेकडो सैनिक त्यांच्या दिशेने कवायत करत येत असताना पाहिले. “हे निळ्या गणवेषातले सैनिक उत्तरेकडच्या सैन्यातले दिसतायत,” जॉनी नेलच्या कानात कुजबुजला.

एक उंचपुरा सैनिक रांग सोडून जॉनीजवळ आला. “हॅलो, मी *बेन*. हे छानसं काळं खेचर तुझं आहे का?”

“नाही, नाही. ते *डॉ. होगाट*चं आहे. हे शेत त्यांचंच आहे. मी त्यांचा गुलाम आहे.”



“अस्सं अस्सं!” नेलचे मऊशार नाक खाजवत बेन म्हणाला. “हे शेत आणि खेचर तुझं नाही, तर मग आमच्यासोबत का येत नाहीस? तुझ्यासारख्या बळकट मुलांची सैन्याला गरज आहे. तू सैन्यात दाखल झालास तर गुलामगिरीतून मुक्तसुद्धा होशील.”

सैन्याला माझी गरज आहे! जॉनीचा आपल्या कानांवर विश्वासच बसेना. त्याने बेनच्या दयाळू चेहऱ्याकडे पाहिले. “पण मी तुमच्यासोबत गेलो तर मालक मला पळपुटा म्हणून घोषीत करतील.”

बेनने त्याच्या खांद्यावर थोपटले. “त्याची चिंता करू नकोस. आम्ही तुझी सगळी काळजी घेऊ.”



जॉनीला गुलाम म्हणून जगायचे नव्हते. पण सिलासकाका आणि नेलला सोडून कसे जायचे? मग त्याला सिलासकाकांचे शब्द आठवले. जॉनीने स्वत:ची समजूत घातली. “मी सैन्यात गेलो तर कदाचित उद्या सिलासकाकांना मुक्त होण्यास मदतच करीन.”

जॉनीने आपले हात नेलच्या गळ्याभोवती टाकले. नेलने आपले मोठे डोके त्याच्या हातांना घासले. “नेल, तू आता घरी जा. मी यांच्यासोबत जातो. पण मी तुला कधीच विसरू शकणार नाही,” जॉनी नेलला म्हणाला.

मग जॉनी आपल्या नव्या मित्रासोबत चालू लागला. बेनने इतर सैनिकांना म्हटले, “मित्रांनो, हा जॉनी. त्याला सैनिक बनायचंय.”



## प्रदीर्घ पल्ला

सुरुवातीला सैनिकांसोबत चालताना जॉनीला खूप उत्साह वाटला. पण सैनिक इतक्या वेगात चालत होते की त्यांच्या बरोबरीने पावले टाकण्यास त्याला कठीण जाऊ लागले. त्याचे पाय दुखू लागले. त्याला शरम वाटू लागली. आपण खूप लहान असल्यागत त्याला वाटू लागले.

जॉनीला सिलासकाका आणि नेलची खूप आठवण येऊ लागली. इथे येऊन मी योग्य केलं का? तो गोंधळला. पण आता खूप उशीर झाला होता. तो मागे वळू शकत नव्हता.

सैनिक थांबले. प्रत्येकजण शिबीर बनवण्यात व्यस्त झाला. जॉनी एकटा पडला. काय करावे, ते त्याला सुचेना.

इतक्यात बेनने त्याचा हात हातात घेतला. “चल, तुझी *डेव्ह*शी भेट घालून देतो. तो जेवण वगैरे माल पुरवतो. त्याच्या खेचरांना खाऊ घालायचे काम तू करू शकतोस.”





जेवणाच्या वेळी डेव्हने जॉनीला एक टीनची थाळी आणि कप दिला. जॉनीने भाजी आणि मांस खाल्ले. शिवाय, एक वेगळेच कडक बिस्किटही खाल्ले. त्यांची चव त्याला विचित्र आणि नविनच लागली.

जेवल्यानंतर सैनिक शेकोटीभोवती बसले आणि गप्पा मारू लागले. “ये जॉनी. बस इथे,” डेव्हने जॉनीला त्याच्या शेजारी बसवले. निजायच्या वेळी डेव्हने जमिनीवर घोंगडी अंथरली. “थंडी वाजली तर हेच अंगावर लपेटून घ्यायचे,” तो म्हणाला.

जॉनी थँड पडलेल्या कठीण जमिनीवर झोपायचा प्रयत्न करू लागला. त्याचे पाय दुखू लागले. मन बावरे झाले! *मी योग्य केलं का?* जॉनी पुन्हा विचारात हरवला.





तंबूत प्रवेश केल्यावर डेव्हने कप्तानाला सलाम ठोकला. “कप्तान, हा जॉनी. हा रस्त्यावर सापडला,” डेव्ह जॉनीच्या खांद्यावर थोपटत म्हणाला.

कप्तान म्हणाला, “अच्छा, तर तुला सैनिक बनायचंय. पण तुझं वय खूप लहान वाटतंय, हो ना!”

जॉनी बावरला. पण मान वर उचलून म्हणाला, “मी लहान आहे, पण बळकट आहे. मी खेचरांची देखभाल करू शकतो.”

“व्वा! फारच छान!” कप्तान हसत हसत म्हणाला.

## सैन्यात भर्ती

सकाळी डेव्हने जॉनीला हलकेच हलवून जागे केले. “चल, आपण कप्तानाला भेटायला जाऊ,” डेव्ह म्हणाला. “तो आपल्या तुकडीचा प्रमुख आहे.”



“सामानाची गाडी घेऊन जाताना याची मदत होईल मला,” डेव्ह म्हणाला.

कप्तानाने मान डोलावली. “जॉनी, मदत करशील डेव्हला?”

जॉनीने कप्तानाला डेव्हसारखा सलाम ठोकायचा प्रयत्न केला. “नक्कीच सर!”

डेव्ह आणि कप्तान हसू लागले.



डेव्हला आपल्या खेचरांचा अभिमान होता. “आपली तुकडी सर्वोत्कृष्ट आहे,” तो जॉनीला त्याच्या सामानाच्या गाडीला जोडलेल्या खेचरांची नावे सांगू लागला. “हे पुढचे आहेत *जिमी* आणि *जेनी*, गाडीला खेचणारे मुख्य खेचर. हे मध्यभागी आहेत, *पीट* आणि *ऱ्होडा* आणि हे चाकांलगत आहेत, *किट्टी* आणि *टफ*.”

जॉनीने किट्टीच्या मानेला खाजवले. ते अगदी नेलसारखेच दिसत होते. “सहा खेचरांची गाडी चालवणे हे सोपे काम नाही, जॉनी,” डेव्हने जॉनीला सावध केले.

जॉनीने स्मित केले, किट्टीला थोपटले. “मी प्रयत्न करतो.”





## जॉनीवर जबाबदारी

दररोज जॉनी खेचरांची गाडी चालवण्याचा कसून सराव करू लागला. “तू खेचरांना चांगलं हाताळतोयस,” डेव्हने जॉनीचे कौतुक केले.

“मी सामानाने भरलेली गाडी चालवून पाहू का?” जॉनीने आवेशात विचारले.

“नको, नको, इतक्यात नको. तुला अजून सराव करायला हवा,” डेव्हने त्याला समजावले.

एके रात्री जेवणाच्या वेळी डेव्ह हजर नव्हता. कप्तानाने विचारले, “डेव्ह कुठाय?”

“त्याच्या पोटात दुखतंय,” जॉनी उत्तरला. कप्तान नाराज झालेला दिसला. “जॉनी, तुझ्या गाडीत काय आहे?”

“डुकराचे मांस, कॉफी आणि बिस्किटं,” जॉनी म्हणाला.

कप्तान चिंतेत पडला. “आपले काही सैनिक नदीपल्याड गस्त घालतायत. सकाळपासून त्यांच्या पोटात अन्नाचा दाणा नाही गेला.” ते म्हणाले.



"मला गाडी घेऊन जायची परवानगी द्या," जॉनीने आर्जव केले.

"पण तू एकटा सहा खेचरांना आवरू शकशील का, जॉनी?" कप्तानाने विचारले.

जॉनीने आवंढा गिळला. "माझ्यावर विश्वास ठेवा."

रात्रीच्या अंधारात सहा खेचरांना ओढणे खूप जिकिरीचे होते, पण जॉनीने ते काम केले. त्याने किट्टीच्या पाठीवर थोपटले आणि म्हटले, "बेन आणि इतर सैनिक भुकेलेले आहेत. त्यांना जेवण घेऊन जायला हवं. कोणत्याही परिस्थितीत!"



जॉनी काळोख्या रस्त्यावरून गाडी हाकू लागला. अध्येमध्ये, ढगांआडून चंद्रबिंब डोकावत होते. थंडीने जॉनी कुडकुडत होता. अचानक त्याला पाण्याचा खळखळाट ऐकू आला. पुढे त्याला एक पूल दिसला. अरे बापरे! नदी!





## पुलावर

जॉनीच्या कानात पाण्याची गर्जना घुमू लागली. त्याला पूल पार करायचे भय वाटू लागले. पण त्याच्यापुढे दुसरा पर्यायही नव्हता. बेन आणि इतर सैनिकांना अन्नाची गरज होती. “चला, दोस्तांनो, निघूया,” अखेरीस धैर्य एकवटून तो म्हणाला.

खेचरांनी हळूहळू आपली पावले पुलाच्या लाकडी फळ्यांवर टाकली. जॉनीला खाली पाहाण्याची हिंमत होत नव्हती. खोल, गारेगार पाण्याचा विचार करूनच त्याला हुडहुडी भरली.

*बूम!* जवळपास एक तोफ कडाडली. खेचर थरारले. त्यांनी डोके हलवले. त्यांचे डोळे भयाने विस्फारले.

जॉनीने खेचरांना शांत करण्याचा प्रयत्न केला. “शांत व्हा! अगदी शांत!” अचानक त्याला एक मोठा हिसका जाणवला. *क्रॅक!* “कुठेतरी तडा गेला वाटतं?” जॉनी घाबरला.

त्याला गाडीला धक्का बसत असल्याचे जाणवले. गाडीच्या चाकांमुळे पुलाची एक लाकडी फळी तुटली होती. त्यात गाडीचे चाक अडकले होते.





जॉनीने खाली पाहिले. गाडी आणखी घसरली असती तर कलंडून पाण्यात पडली असती. त्याने किट्टीचा लगाम घट्ट धरला आणि तिच्या पाठीवर चाबूक उगारला. “चल किट्टी.”

किट्टी गाडी ओढण्याचा प्रयत्न करत होती, हे जॉनीला जाणवत होते. पण सामानाने भरलेली अवजड गाडी जागची हलतच नव्हती. जॉनी खाली झुकून ओरडला, “चल किट्टी, तू ।गाडी ओढू शकतेस.”

हळूहळू अडकलेले चाक वर काढण्यात आणि गाडी पुढे नेण्यात जॉनीला यश मिळाले. मग त्याने गाडी सुरक्षितपणे पुलाच्या पार नेली.

किट्टीचे शरीर अजूनही थरथरत होते. जॉनीचे हातसुद्धा कापत होते. चंद्रप्रकाशात जॉनीला पुढे सैनिकांचे शिबीर दिसले. अचानक, त्याने कुणाचातरी आवाज ऐकला, “बघा दोस्तांनो, जॉनी आलाय.”



बेन त्वरेने गाडीकडे धावला आणि त्याने जॉनीला खाली उतरवले. “ठीक आहेस ना, बेन?” जॉनीने विचारले.

“तुझ्या कृपेने आम्ही सर्वजण एकदम ठीक आहोत,” बेन हसतहसत म्हणाला.

“जॉनीचा जयजयकार असो,” उत्साहाने सैनिक दबक्या आवाजात ओरडले.





डेव्हने जॉनीच्या गळ्याभोवती हात टाकले. “होय कप्तान, हीच ती गाडी. ती हाकायला जॉनी तयार आहे, अशी खात्री नव्हती मला. पण त्याने आपली कुवत सिद्ध केली. तो कुणा सैनिकाइतकाच सक्षम आहे.”

कप्तानाने मान हलवली. “एकच समस्या आहे.”

“माझ्याकडून काही चूक घडली का, कप्तान?” जॉनीने काळजीच्या स्वरात विचारले.

## खेचरांच्या गाडीचा सर्वात छोटा चालक

पुढच्या दिवशी सकाळी डेव्हची तब्येत सुधारली. तो आणि जॉनी आपल्या गाडीची दुरुस्ती करू लागले. तेवढ्यात कप्तान त्यांना भेटायला आले. “आपल्या सैन्यातल्या सर्वोत्तम चालकांची गाडी हीच का?” त्यांनी विचारले.



नाही, समस्या ही आहे की तू सैनिकासारखा दिसत नाहीस,” कप्तान म्हणाले.

जॉनीने आपल्या फाटक्या कपड्यांवर नजर टाकली. “पण माझ्याकडे एवढेच कपडे आहेत,” तो नाराजीने म्हणाला.

कप्तानाने डोळे मिचकावले आणि जॉनीला एक गाठोडे दिले. जॉनीने गाठोडे उलगडले. “अरे व्वा, सैनिकाचा गणवेष!”

कप्तानाने जॉनीशी हस्तांदोलन केले. “धन्यवाद जॉनी. आमच्या तुकडीत तुझ्यासारखा शूर मुलगा आहे, याचा आम्हाला अभिमान वाटतो.”

जॉनीचा चेहरा उजळला. “मलाही तुमच्या तुकडीत असल्याचा अभिमान वाटतो, कप्तान.” जॉनीने आपला नवा कोट आणि टोपी अंगावर घातले आणि सलाम केला. डेव्ह आणि कप्तान यांनीही त्याला सलाम केला.



जॉनी किट्टीला आपला नवा गणवेष दाखवण्यासाठी पळत गेला. “बघ, किट्टी, आता मी खराखुरा सैनिक झालो. सिलासकाका आणि नेल हवे होते इथे, हे पाहायला.” किट्टीने आपले मोठे डोके जॉनीच्या हातांना घासले, अगदी नेलसारखेच!

“माझं तुझ्यावर प्रेम आहे, किट्टी,” जॉनी हसतहसत म्हणाला. “आणि माझ्या नव्या मित्रांवरसुद्धा! पण माझं सर्वात जास्त प्रेम या स्वातंत्र्यावर आहे.”





# लेखकाचे मनोगत

नागरी युद्धादरम्यान आफ्रिकी-अमेरिकी लोकांना सैन्यात जाण्यासाठी खूप संघर्ष करावा लागे. *गुलाम ते सैनिक* ही एक काल्पनिक कथा आहे. पण ती *जॉन मॅक्लाईन* नावाच्या एका खऱ्याखुऱ्या मुलाच्या आयुष्यावर आधारित आहे. जॉन अकरा वर्षांचा असताना टेनेसीतील एका मळ्यात गुलाम होता. 1862 साली एके दिवशी तो तिथून पळाला आणि कवायत करत जाणाऱ्या एका सैन्याच्या तुकडीत सामील झाला. तरूण जॉन नागरी युद्ध संपेपर्यंत खेचरगाडीच्या चालकाचा मदतनीस म्हणून काम करत राहीला.

युद्धानंतर जॉन शाळेत गेला, त्याने हॉटेलात काम केले. 1892 साली तो न्यू मेक्सिको राज्यातील सांता फे शहरात *हर्बर्ट हॅगर्मन*च्या घरी काम करू लागला. 1930 साली मॅक्लाईनने आपल्या तारुण्यातील आठवणी लिहून हॅगर्मन यांना दाखवल्या. त्यांनी त्या टंकलिखित केल्या आणि त्याची प्रस्तावना लिहिली.

पण मॅक्लाईनच्या हयातीत काही त्याचे पुस्तक प्रसिद्ध झाले नाही. मात्र टंकलिखित केलेली पुस्तकाची प्रत त्याच्या कुटुंबाकडे सुरक्षित राहिली. 1998 साली टेनेसी विद्यापीठाने हे पुस्तक प्रकाशित केले. मॅक्लाईनने वयाच्या शहाऐंशीव्या वर्षी लग्न केले. 1948 साली त्याचा मृत्यू झाला तेव्हा तो पंचाण्णव वर्षांचा होता.

ही कथा रणांगणावर अन्नाची रसद घेऊन जाताना मॅक्लाईनला आलेल्या अनुभवांवर आधारित आहे. युद्धानंतर इतक्या वर्षांनीसुद्धा मॅक्लाईनला त्या सर्व खेचरांची नावे आठवत होती. या कथेत त्यांची नावे बदललेली नाहीत. सैन्यातील कृष्णवर्णीय सैनिकांना सन्मानाची वागणूक मिळत नसे. पण मॅक्लाईनला अशी वागणूक मिळाली नाही. जॉन मॅक्लाईनच्या स्मृतींमधून आपल्याला तत्कालिन परिस्थितीत एक गुलाम मुलगा सैनिक कसा बनला, याची झलक वाचायला मिळते. मला आशा आहे की तुम्ही ही कथा कधी ना कधी नक्कीच वाचाल.

**समाप्त**